**धर्मादाय आयुक्तांच्या प्रशासनिक कामकाजात सुधारणा करण्याकरिता श्री. रत्नाकर गायकवाड, माजी मुख्य सचिव महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएचसी १११८/(प्र.क्र.१९२/१८)/कार्या-१७.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

राज्यातील सार्वजनिक न्यास व धर्मादाय संस्थांचे कामकाज, "मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० " या अधिनियमातील तरतुदीनुसार चालते. सध्या खाजगी धर्मादाय संस्थांना, धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या प्रशासनिक कामकाजाच्या अनुषंगाने अनेक समस्यांना सामोरे जावे लागत आहे. त्यामुळे, धर्मादाय आयुक्त कार्यालयाचे प्रशासन व धर्मादाय संस्था व सार्वजनिक न्यास यांच्यामधील संबंधात सुधारणा करणे, प्रशासनिक कामकाज सुलभपणे व पारदर्शक पध्दतीने चालविणे, सार्वजनिक न्यासांना अधिकतम सहाय्य करणे व धर्मादाय संस्थांवर वाजवी संनियंत्रण ठेवणे, जबाबदारीची निश्चिती करणे, प्रतिसादात्मक कार्यपध्दती विहित करणे, धर्मादाय आयुक्त कार्यालयातील कामकाज तंत्रज्ञानाच्या मदतीने जलद करुन कार्यालयातील प्रलंबित प्रकरणांचा निपटारा लवकरात लवकर करणे, कार्यालयातील अभिलेख डिजीटाईज / ऑनलाईन करणे, नागरीकांना सेवा हमी कायद्यांतर्गत सेवा पुरविण्याबाबत तरतुदी करणे, लोकांमध्ये धर्मादाय आयुक्त कार्यालयांसंदर्भात विश्वासाचे वातावरण निर्माण करणे, त्याकरिता " मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५०" या अधिनियमात आवश्यकतेनुसार सुधारणा करणे, आवश्यकतेनुसार मनुष्यबळात वाढ करणे, इत्यादीकरिता प्रशासनिक, तांत्रिक व कायदेशीर उपाययोजना सुचविण्यासाठी एक उच्चस्तरीय अभ्यास समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

वरील पार्श्वभूमीवर धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या प्रशासनिक कामकाजात सुधारणा करण्यासाठी प्रशासनिक, तांत्रिक व कायदेशीर उपाययोजना सुचविण्याकरिता व त्यानुषंगाने आवश्यकतेनुसार " मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० " मधील तरतुदींमध्ये दुरुस्ती करण्यासंदर्भातील शिफारशी करण्यासाठी, श्री.रत्नाकर गायकवाड, माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे एक उच्चस्तरीय अभ्यास समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र | नाव | पदनाम | पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.रत्नाकर गायकवाड | माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | अध्यक्ष |
| २ | ॲडव्होकेट श्री.श्रीहरी अणे | माजी महा अधिवक्ता, महाराष्ट्र | सदस्य |
| ३ | श्री.एस.बी.सावळे | माजी धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई | सदस्य |
| ४ | श्री.भरत प. व्यास | धर्मादाय उप आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्री.अमित चंद्रा | एटीई चंद्रा फाऊंडेशन,बेन कॅपिटल ॲडव्हायझर्स इंडिया प्रायव्हेट लि., २१५, दुसरा मजला, फ्री प्रेस हाऊस, नरीमन पॉइंट, मुंबई. | सदस्य |
| ६ | श्री. राजेश कडाकीया | कडाकीया असोसिएटस्,मुंबई, | सदस्य |
| ७ | डॉ. मिलींद अंतानी | भागीदार, निशिथ देसाई असोसिएटस्, मुंबई | सदस्य |
| ८ | श्री.सुहैल नाथानी | व्यवस्थापकीय भागीदार, ईकॉनॉमिक अँड लॉ प्रॅक्टीस, ॲडव्होकेटस् अँड सॉलीसिटर्स, मुंबई | सदस्य |
| ९ | श्री.विवेक सावंत | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र नॉलेज कॉर्पोरेशन लिमिटेड, पुणे | सदस्य |
| १० | श्री.गिरीश सोहोनी | प्रेसिडेंट ॲन्ड मॅनेजींग ट्रस्टी ऑफ बायेफ डेव्हलपमेंट रिसर्च फाऊंडेशन, पुणे | सदस्य |
| ११ | श्री.धीरु भाई मेहता | अध्यक्ष, कस्तुरबा हेल्थ सोसायटी, मुंबई | सदस्य |
| १२ | डॉ.आनंद बंग | सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १३ | श्री.राजेंद्र द. सावंत | विधि सल्लागार नि सहसचिव (कार्यासन १- धर्मादाय आयुक्त कार्यालयाशी संबंधित सर्व आस्थापना विषयक बाबी व १५ - "मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५०" मध्ये करावयाचे बदल / सुधारणा),विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| १४ | श्री.रा.बा.घाडगे | सहसचिव (कार्यासन १७- धर्मादाय न्यासाबाबतच्या तक्रारी), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. सदर समितीने आपला अहवाल **<u>तीन महिन्यांमध्ये</u>** शासनास सादर करावा. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

(१) **<u>प्रशासकीय बाबी :-</u>**

(१) धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या सध्याच्या कार्यप्रणालीचा सखोल आढावा घेणे. सदर कार्यालयाच्या मुख्य जबाबदाऱ्या निश्चित करुन त्यानुषंगाने बदल सुचविणे, निधी, कर्तव्ये, मानव संसाधन व निर्णय घेण्याच्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करणे. मानव संसाधनाच्या कर्तव्य आणि जबाबदाऱ्यांमध्ये आवश्यक ते बदल करण्यासंदर्भात सुधारित व्यवस्थापकीय रचना सुचविणे.

(२) प्रशासकीय बाबी, प्रलंबित प्रकरणांचा निपटारा, सार्वजनिक न्यास विश्वस्तांची नियुक्ती, पायाभूत सोयी सुविधांमध्ये सुधारणा, डिजीटल तंत्रज्ञान, माहितीच्या अधिकाराचा गैरवापर, मानव सेवाविषयक नियम, अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या नियमित बदल्या, धर्मादाय आयुक्त कार्यालय विरोधात प्राप्त झालेल्या तक्रारी इ. बाबींमधील विविध प्रकरणांचा सखोल अभ्यास करुन उच्च दर्जाच्या कार्यपद्धतींची शिफारस करणे,

(३) सार्वजनिक न्यास आणि नागरिकांना सार्वजनिक न्यासाची सुलभ पध्दतीच्या नोंदणीबाबत खात्री देण्यासाठी मार्ग सुचविणे, चांगल्या संस्था आणि सार्वजनिक न्यास यांना सहाय्य करणे आणि जनतेला कायदेशीर मदत व सल्लाविषयक सेवा उपलब्ध करुन देणे, धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या शैक्षणिक प्रबोधनाच्या भूमिकेला बळकटी आणण्यासाठी उपाय सूचविणे, सर्व प्रकारच्या दस्तऐवजांमधील त्रुटी दूर करुन प्रमाणित व सुलभ नमुने तयार करणे,

(४) धर्मादाय आयुक्त कार्यालयाकडून होणारा प्रशासकीय विलंब टाळण्यासाठी सुनिश्चित कार्यपद्धती निश्चित करणे, धर्मादाय आयुक्त कार्यालयाच्या विविध कामकाजासंदर्भात कर्तव्ये व जबाबदाऱ्यांची निश्चिती करणे, अंतर्गत चौकशीसाठी यंत्रणा व कार्यप्रणाली निश्चित करणे, तसेच, त्या अनुषंगाने उपाय योजना सुचविणे,

(५) अनावश्यक बाबींची पूर्तता करण्यासंदर्भातील हरकतींचे निर्मुलन करणे, अनावश्यक अटी घालून ना हरकत प्रमाणपत्र देण्याच्या कार्यपध्दतीचे निर्मुलन करणे, त्याऐवजी सुलभ कार्यपध्दती निश्चित करणे,

(६) सरकारी कर्मचाऱ्यांनी त्यांचे स्वत:चे सार्वजनिक न्यास स्थापन करण्यासंदर्भातील कार्यपध्दती निश्चित करणे.

**<u>(ब) तांत्रिक बाबी:-</u>**

खालील बाबीं हाती घेण्यासंदर्भात कार्यपद्धती निश्चित करणे :-

(१) चेंज रिपोर्ट ३० दिवसांत निकाली न काढल्यास आपोआप मान्य झाल्याचे समजणे,

(२) अनुशेष असल्यास निकाली काढणे व भविष्यात अनुशेष निर्माण होणार नाही अशा प्रकारची कार्यपध्दती विहित करणे,

(३) अनुचित कार्यपद्धतीमुळे नस्ती गहाळ होण्याचे प्रकार टाळण्यासाठी नस्तीचा मागोवा घेणारी डिजीटल कार्यप्रणाली यंत्रणा विकसित करणे,

(४) सर्व अभिलेख स्वयंचलीत पध्दतीने अद्यावत होतील अशा प्रकारची डिजीटल कार्यप्रणाली यंत्रणा विकसित करणे,

(५) डिजीटाइज्ड / ऑनलाईन माहितीसुद्धा (जसे पॅन कार्ड, मालमत्ता, ऑडीट रिपोर्ट इ.) खात्रीशिररीत्या गोपनीय ठेवणे.

**<u>(क) कायदेशीर बाबी :-</u>**

(१) लोकसेवा हक्क अधिनियमामध्ये अंतर्भूत करण्यासाठी धर्मादाय आयुक्तांच्या विविध सेवांची निश्चिती करणे.

(२) नागरी, उपनगरी, ग्रामीण, आदिवासी व डाव्या विचारसरणीमुळे प्रभावित विभाग असे राज्यातील विविध क्षेत्रांचे भौगोलिक विभाजन विचारात घेऊन त्या त्या भागांसाठी योग्य नियमांची निश्चिती करणे.

(३) संदिग्ध व अनावश्यक कायदेविषयक तरतुदी आणि करविषयक बाबी यांची यादी तयार करुन ती रद्द करणे.

(४) माहितीचा अधिकार अधिनियमाचा मुख्य उद्देश व गाभा याला धक्का न लावता, त्याचा गैरवापर टाळण्यासाठी कायदेशीर तरतूदी व कार्यपद्धती यांची निश्चिती करणे.

३. मा.मुख्यमंत्री कार्यालयातील सल्लागार श्री.यश किरकिरे व श्री. सौरभ कानडे हे सदर समितीस सहाय्य करण्याचे व समन्वयाचे काम करतील. सदर समिती कार्यशाळा आयोजित करु शकेल. जनतेची सुनावणी घेऊ शकेल, जनतेकडून योग्य त्या सूचना मागविण्याचे कार्य करु शकेल, तसेच, तज्ञ सल्लागारांची मदत घेऊ शकेल.

४. सदर समितीच्या बैठकीचे आयोजन, चहापान, प्रवास खर्च यासाठी येणारा खर्च हा सार्वजनिक न्यास प्रशासन निधीमधून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११२१५३०३८१०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra
Gajanan
Bhagwat

Digitally signed by Rajendra Gajanan Bhagwat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=Law and Judiciary Department,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=cc7aabd81415b8f5527e47fcdf6cb267b325f7490f2a874918347994ab7f727a,
serialNumber=d818186dee70df53c608510c8f5de9e22be5a193d4a6472ca4de45a568dc44a7,
cn=Rajendra Gajanan Bhagwat
Date: 2018.11.12 18:34:17 +05'30'

**( राजेन्द्र ग.भागवत )**
प्रभारी प्रधान सचिव व विधि परामर्शी.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. राज्यमंत्री, विधि व न्याय विभाग यांचे खाजगी सचिव.
४. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. श्री.रत्नाकर गायकवाड,माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, फ्लॅट नं.३२, शिवांजली को.ऑप.हाऊसिंग सोसायटी, मॉडेल टाऊन, प्लॉट नं.१४१, जे.पी.रोड समोर, अंधेरी (प.), मुंबई : ४०० ०५३.
६. ॲडव्होकेट श्री.श्रीहरी अणे, माजी अधिवक्ता, महाराष्ट्र शासन, १२ ए, सागर संगीत, शहीद भगतसिंग मार्ग, कुलाबा, मुंबई ४००००५.
७. श्री. एस. बी. सावळे, माजी धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई, बंगला क्र. ५८/१, " कर्मयोग ", लेडीज क्लब चौक, सिव्हील लाईन्स, नागपूर ४४०००१.
८. श्री.भरत प.व्यास, धर्मादाय उप आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
९. श्री.अमित चंद्रा, एटीई चंद्रा फाऊंडेशन, बेन कॅपिटल ॲडव्हायझर्स इंडिया प्रायव्हेट लि., २१५, दुसरा मजला, फ्री प्रेस हाऊस, नरीमन पॉइंट, मुंबई ४०००२१.
१०. श्री. राजेश कडाकीया, कडाकीया असोसिएटस्, मुंबई, आर.एस. कडाकीया अँड कं., १, चंदन निवास, अंधेरी जिमखान्याच्या मागे, विशाल हॉलसमोर, सर एम. व्ही.रोडजवळ, अंधेरी ( पूर्व ), मुंबई ४०००६९.
११. डॉ. मिलींद अंतानी, भागीदार, निशिथ देसाई असोसिएटस्,९३बी, मित्तल कोर्ट, नरीमन पॉइंट, मुंबई.

१२. श्री.सुहैल नाथानी, व्यवस्थापकीय भागीदार, ईकॉनॉमिक अँड लॉ प्रॅक्टीस, ॲडव्होकेटस् अँड सॉलीसिटर्स, १०९, ए विंग, दलामल टॉवर्स, नरीमन पॉइंट, मुंबई ४०००२१.

१३. श्री.विवेक सावंत, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र नॉलेज कॉर्पोरेशन लिमिटेड, सहावा मजला, ए विंग, आयसीसी ट्रेड टॉवर, सेनापती बापट मार्ग, पुणे.

१४. श्री.गिरीश सोहोनी, प्रेसिडेंट ॲन्ड मॅनेजींग ट्रस्टी ऑफ बायेफ डेव्हलपमेंट रिसर्च फाऊंडेशन, बायेफ भवन, डॉ.मनीभाई देसाई नगर,एनएच ४ बायपास, माई मंगेशकर हॉस्पीटल जवळ, वारजे, पुणे ४११०५८.

१५. श्री.धीरु भाई मेहता, अध्यक्ष, कस्तुरबा हेल्थ सोसायटी, ३०१/३०२, गोरा गांधी, ३ लॅबर्नन रोड, गामदेवी, मुंबई ४०० ००७.

१६. डॉ.आनंद बंग, सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.

१७. श्री.राजेंद्र द. सावंत,विधि सल्लागार नि सहसचिव,(कार्यासन १ व १५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१८. श्री.रा.बा.घाडगे,सहसचिव(कार्यासन १७), विधि व न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई-३२

१९. श्री.यश किरकिरे,सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.

२०. श्री.सौरभ कानडे, सल्लागार, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.

२१. कार्यासन १७-संग्रहार्थ.